**प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजनेंतर्गत (PMFME) सन २०२५-२६ वर्षाकरिता प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणे तसेच योजनेकरिता पहिल्या हप्त्याचा रु. १५६,६६,६६,६६५/- निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मस्यव्यवसाय विभाग,**

**शासन निर्णय क्र. प्रअयो २०२५/प्र.क्र.१२३/९-अे**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.

तारीख :- २५ एप्रिल, २०२५

वाचा:

१. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.१२०/९-अे, दि. २३.१२.२०२०

२. केंद्र शासनाचे कार्यालयीन ज्ञापन क्र. F. No. P-12027/3/2024-PC DIVISION, दि. ३०.०९.२०२४

३. PMFME Division, Ministry of Food Processing Industries यांचा दि. २७.११.२०२४ रोजीचा रोजीचा ई-मेल

४. कृषि व पदुम विभागाचे पत्र क्र. प्रअयो २०२४/प्र.क्र. १५३/९अे, दि.१८.०३.२०२५ (दि. १८.०२.२०२५ रोजी संपन्न झालेल्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समिती (SLAC) च्या बैठकीचे इतिवृत्त)

५. नोडल अधिकारी (PMFME) तथा संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा. क्र. PMFME/PIP २०२५-२६/७५-R/२०२५, दि. ०३.०४.२०२५

६. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: अर्थसं-२०२५/प्र.क्र. ४४/अर्थ-३, दिनांक ०७.०४.२०२५

७. केंद्र शासनाचे कार्यालयीन ज्ञापन क्र. File No. FM-11/5/2020-DS(FME)-Part(1), दि.१७.०४.२०२५

८. नोडल अधिकारी (PMFME) तथा संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा. क्र. पीएमएफएमई/राज्य हि./२५-२६/९००३/२०२५, दि. २२.०४.२०२५

**प्रस्तावना :-**

राज्यातील असंघटित अन्न प्रक्रिया क्षेत्रातील उद्योगांच्या समस्यांचे निराकरण करण्यासाठी केंद्र पुरस्कृत Prime Minister Scheme for Formalization of Micro Food Processing Enterprises (PMFME) या योजनेस केंद्र शासनाने मान्यता दिली आहे. या पार्श्वभूमीवर केंद्र शासन पुरस्कृत प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (Prime Minister Scheme for Formalization of Micro Food Enterprises (PMFME) ही योजना राज्यात सन २०२०-२१ पासून पुढील पाच वर्षासाठी म्हणजे सन २०२४-२५ पर्यंत

राबविण्यास संदर्भ क्र. १ येथील दि. २३.१२.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. तथापि केंद्र शासनाने संदर्भ क्र. २ येथील दि. ३०.०९.२०२४ रोजीच्या पत्रान्वये योजनेस सन २०२५-२६ या आर्थिक वर्षासाठी मुदतवाढ दिलेली आहे.

PMFME योजनेंतर्गत सन २०२५-२६ करीता रु.४२७.४२ कोटी रकमेच्या आराखडयास दि.१८.०२.२०२५ रोजी संपन्न झालेल्या मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील SLAC च्या बैठकीत मंजूरी दिल्यानंतर संदर्भ क्र. ५ येथील दि.०३.०४.२०२५ रोजीच्या पत्रान्वये केंद्र शासनास सादर करण्यात आला आहे. केंद्र शासनाने संदर्भ क्र. ७ येथील दि.१७.०४.२०२५ रोजीच्या पत्रान्वये सन २०२५-२६ अंतर्गत प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना करिता विभाजीत घटक (Sharable Components) केंद्र: राज्य (६०:४०) घटकाकरिता रु.८५.०० कोटी व अविभाजीत घटक (Non Sharable Components - केंद्र १००%) घटकाकरिता रु.१५.०० कोटी असे एकूण केंद्र हिश्याचा रक्कम रु. १००.०० कोटी निधीस प्रवर्गनिहाय Mother Sanction प्रदान केले असून सन २०२५-२६ साठी मंजूर नियतव्ययाच्या ५०% असल्याचे दि. १७.०४.२०२५ रोजीच्या निधी वितरणाच्या आदेशामध्ये नमूद करण्यात आले आहे. त्यानुसार वर्ष २०२५-२६ मध्ये रु.२००.०० कोटी निधी मिळेल असे गृहीत धरल्यास त्यास अनुसरुन प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (PMFME) सन २०२५-२६ मध्ये राज्यात राबविण्याकरिता प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणे आवश्यक आहे.

त्यानुषंगाने, प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (PMFME) सन २०२५-२६ मध्ये राज्यात राबविण्याकरिता प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची व केंद्र शासनाकडून प्राप्त पहिल्या हप्त्याचा निधी आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुसार शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

केंद्र सहाय्यीत प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (PMFME) सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात राबविण्यासाठी मुदत वाढ देण्यात येत आहे.

२. प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (PMFME) या योजना सन २०२५-२६ मध्ये राबविण्यासाठी केंद्र हिस्सा रु. २००.०० कोटी (रुपये दोनशे कोटी फक्त) व त्या समरूप राज्य हिस्सा रु. ११३.३३ कोटी (रुपये एकशे तेरा कोटी तेहत्तीस लाख फक्त) असा एकूण रु. ३१३.३३ कोटी (रु.तीनशे तेरा कोटी तेहत्तीस लाख फक्त) रकमेच्या कार्यक्रमास प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे, त्याचा प्रवर्गनिहाय तपशील पुढीलप्रमाणे :

(रु. कोटीत)

| | विभाजीत घटक केंद्र: राज्य (६०:४०) | | | | अविभाजीत घटक (केंद्र १००%) |
|---|---|---|---|---|---|
| | सर्वसाधारण प्रवर्ग | अनुसूचित जाती | अनुसूचित जमाती | एकूण | एकूण |
| **केंद्र हिस्सा** | १४५.२४ | १२.८६ | ११.९० | १७०.०० | ३०.०० |
| **राज्य हिस्सा** | ९६.८२ | ८.५७ | ७.९३ | ११३.३२ | ०.०० |
| **एकूण** | **२४२.०६** | **२१.४३** | **१९.८३** | **२८३.३२** | **३०.००** |

३.	केंद्र शासन पुरस्कृत प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (PMFME) सन २०२५-२६ मध्ये राज्यात राबविण्याकरिता ३३- अर्थसहाय्य या उद्दिष्टाखाली Sharable Components साठी रु.१४१,६६,६६,६६५/- व Non-Sharable Components साठी रु. १५,००,००,०००/- असा एकूण रु. १५६,६६,६६,६६५/- निधी राज्य नोडल एजन्सी (PMEME) तथा आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना खालीलप्रमाणे वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रक्कम- रुपयात)

| **प्रवर्ग** | **Sharable Components** | | | **Non-Sharable Components** |
|---|---|---|---|---|
| | **केंद्र हिस्सा** (६०%) | **राज्य हिस्सा** (४०%) | **एकूण रुपये** | **केंद्र हिस्सा** (100%) |
| (1) | (2) | (3) | (4) (2 + 3) | (5) |
| सर्वसाधारण | ७२,६२,००,००० | ४८,४१,३३,३३३ | १,२१,०३,३३,३३३ | १५,००,००,००० |
| अनु. जाती | ६,४३,००,००० | ४,२८,६६,६६७ | १०,७१,६६,६६७ | ० |
| अनु.जमाती | ५,९५,००,००० | ३,९६,६६,६६७ | ९,९१,६६,६६७ | ० |
| **एकूण** | ८५,००,००,००० | ५६,६६,६६,६६७ | १,४१,६६,६६,६६७ | १५,००,००,००० |

४.	या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| **प्रवर्ग** | **केंद्र हिस्सा** | **राज्य हिस्सा** |
|---|---|---|
| सर्वसाधारण<br>(SLS Code 578) | मागणी क्र. डी-३<br>२४०१, पीक संवर्धन<br>००, १०२, अन्नधान्य पिके<br>(००) (००)( ३७) प्रधानमंत्री सूक्ष्म अन्नप्रक्रिया उद्योग योजना (केंद्र हिस्सा १००%)<br>(केंद्र पुरस्कृत योजना) (२४०१ B४६४) | --------- |
| सर्वसाधारण<br>(SLS Code ४२३) | मागणी क्र. डी-३<br>२४०१-पीक संवर्धन<br>१०२-अन्नधान्य पिके<br>(००)(३५) प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (सर्वसाधारण) (केंद्र हिस्सा ६० %)<br>३३-अर्थसहाय्य (२४०१ B३३९) | मागणी क्र. डी-३<br>२४०१-पीक संवर्धन<br>१०२-अन्नधान्य पिके<br>(००)(३६) प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (सर्वसाधारण) (राज्य हिस्सा ४० %)<br>३३-अर्थसहाय्य (२४०१ B३४८) |
| अनु. जाती<br>(SLS Code ४२३) | मागणी क्र. एन-०३<br>२४०१- पीक संवर्धन<br>७८९- अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना<br>०१- अनुसूचित जाती घटकांतर्गत योजना<br>(०१)(२६) प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (केंद्र हिस्सा ६०%)<br>३३ अर्थसहाय्य (२४०१ B३७५) | मागणी क्र. एन-०३<br>२४०१- पीक संवर्धन<br>७८९- अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना<br>०१- अनुसूचित जाती घटकांतर्गत योजना<br>(०१)(२७) प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (राज्य हिस्सा ४०%)<br>३३ अर्थसहाय्य (2401 B384) |
| अनु.जमाती<br>(SLS Code ४२३) | मागणी क्र. टी-०५<br>२४०१- पीक संवर्धन<br>७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना<br>०१- जनजाती क्षेत्र उपयोजनेंतर्गत योजना<br>(०१)(४०) प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (केंद्र हिस्सा ६०%)<br>३३ अर्थसहाय्य (२४०१ B३५७) | मागणी क्र. टी-०५<br>२४०१- पीक संवर्धन<br>७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना<br>०१- जनजाती क्षेत्र उपयोजनेंतर्गत योजना<br>(०१)(४१) प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (राज्य हिस्सा ४०%)<br>३३ अर्थसहाय्य (२४०१ B३६६) |

५. सदर योजना सन २०२५-२६ मध्ये राबविण्याकरिता नोडल एजन्सी, प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (PMFME) तथा आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी तर सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. संदर्भांकित शासन निर्णय दि. २३.१२.२०२० अन्वये विहित केलेल्या तरतुदींनुसार सदर योजनेची अंमलबजावणी करण्यात यावी व त्यानुषंगाने योजना सन २०२५-२६ मध्ये राबविण्याकरिता मार्गदर्शक सूचना कृषि आयुक्तालय स्तरावरून निर्गमित कराव्यात.

७. या शासन निर्णयान्वये वितरीत निधीतुन योजनेंतर्गत निर्माण झालेले प्रलंबित दायित्व प्राथम्याने अदा करुन उर्वरित निधीतुन चालु आर्थिक वर्षाचा कार्यक्रम राबविण्यात यावा.

८. निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित अटी व शर्ती तसेच वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

९. प्रस्तुत आदेश वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: अर्थसं-२०२५/प्र.क्र. ४४/अर्थ-३, दिनांक ०७ एप्रिल, २०२५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०४२५१४४७५११६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षंकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Digitally signed by SHRIKANT CHANDRAKANT ANDGE
Date: 2025.04.25 14:48:59 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
३. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
४. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
५. मा. विरोधी पक्षनेते, महाराष्ट्र विधानपरिषद/महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. सर्व सन्माननीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य.
७. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. अप्पर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११. प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

१२. प्रधान सचिव (कृषि), कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१३. सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१४. सचिव, कौशल्य विकास उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१५. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
१६. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
१७. राज्य नोडल एजन्सी (पीएमएफएमई) तथा आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे.
१८. राज्य नोडल अधिकारी (पीएमएफएमई) तथा संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), पुणे.
१९. सर्व विभागीय कृषि सह संचालक, महाराष्ट्र राज्य.
२०. सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी/तालुका कृषि अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२१. सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२२. महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता)/लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर.
२३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
२४. संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई.
२५. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
२६. सह संचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई-३२.
२७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२८. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई - ३२
२९. कक्ष अधिकारी (का.१४३१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
३०. कक्ष अधिकारी (अर्थ.-१३/ व्यय-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
३१. कक्ष अधिकारी (कार्यासन ६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
३२. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प-विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
३३. कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
३४. निवड नस्ती-९अे.